**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातंर्गत येणा-या समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक कर्मचारी यांचे सेवानिवृत्तिचे वय निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- सकाम२०१६/प्रक्र.१३४/सामासू**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई- ४०००३२,
दिनांक :- २३ ऑगस्ट, २०१८

वाचा:- १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१०/(५०३/१०)/विशी-१ , दि .५ मार्च ,२०११.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/ प्र.क्र.४८४/ १५/वि.शी.-१ , दि .१२ जुलै ,२०१६.

प्रस्तावना:-

महाराष्ट्र राज्यात सामाजिक न्याय विभागातंर्गत कार्यरत असलेली एकूण ५२ मान्यताप्राप्त समाजकार्य महाविद्यालय कार्यरत आहेत. सद्य:स्थितीत सदर ५२ महाविद्यालयांना मान्यता देण्यात आलेली असून पैकी १ बंद, १ विनाअनुदानीत व ५० महाविद्यालये कार्यरत आहेत. समाजकार्य चालविणा-या शाळा व संस्थांना मान्यता व अनुदान देण्यासंबिधीची नियमावली दि.२/२/१९९९ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केली आहे. तसेच दि.१/९/२००५ च्या शासन निर्णयान्वये शिक्षकांचा आकृतिबंध निश्चित करण्यात आला आहे. उच्च व तंत्र विभागाच्या दि. ५/३/२०११ तसेच दि.१२ जुलै,२०१६ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार सेवानिवृत्तीचे वय लागू करण्याबाबत संभ्रम निर्माण होवून मोठया प्रमाणात न्यायालयीन प्रकरणे उद्भवत आहे. उच्च व तंत्र शिक्षण व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग हे दोन्ही विभाग वेग- वेगळी आहेत. व सदर विभागांना स्व:ताची अधिकारीता आहे. त्यामुळे उच्च व तंत्र शिक्षण विभागाने घेतलेले कोणतेही धोरणात्मक निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अखत्यारीत असलेल्या समाजकार्य महाविद्यालयाना लागू नाहीत. सदर वस्तुस्थिती विचारात घेता,सद्यस्थितीत उच्च व तंत्र शिक्षण विभागाचे सेवानिवृत्ती वयाबाबतचे उक्त शासन निर्णय या विभागातंर्गत कार्यरत असलेल्या समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षकीय कर्मचारी यांना लागू करण्यात यावे किंवा कसे याबाबतची ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उच्च व तंत्र शिक्षण विभागाने संदर्भ १ व २ च्या शासन निर्णयान्वये प्राचार्य /अध्यापक/ प्राध्यापक व ग्रंथपाल यांच्या सेवानिवृत्तीच्या वय अनुक्रमे ६५ व ६० आहे. तथापि सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अधिनस्त असलेल्या समाजकार्य महाविद्यालयांना लागू होत नाहीत.त्यामुळे सामाजिक न्याय विभागाच्या अधिपत्याखालील समाजकार्य महाविद्यालयातील प्राचार्य / प्राध्यापक /अध्यापक /ग्रंथपाल यांचे सेवानिवृत्तीचे वय ६० वर्षे इतके राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०८२३१७१५२२०८२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2018.08.23 17:19:57 +05'30'

(ज्ञा.ल.सुळ)
सह सचिव ,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त,समाज कल्याण,पुणे
२. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण
३. सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी
४. अवर सचिव, अर्थ-३, वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई
५. प्राचार्य,सर्व समाजकार्य महाविद्यालय
६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प ), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
७. निवडनस्ती - सामासु